राज्य शासकीय कर्मचारी गट विमायोजना, १९८२
सुधारणा करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

शासन निर्णय क्रमांक गवियो-११८३/प्र. क्र. ६६/८४/प्रशासन-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २८ फेब्रुवारी १९८६

**वाचा**—शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. डीओआय-२०८१/४७०१/एडीएम-५, दिनांक २६ एप्रिल १९८२.
शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२.
शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२.

**शासन निर्णय.**—शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक डीओआय-२०८१/४७०१/एडीएम-५, दिनांक २६ एप्रिल १९८२ आणि शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२ व दिनांक २१ सप्टेंबर १९८२ मध्ये राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना, १९८२ च्या नमूद केलेल्या सूचनांत खालील सुधारणा करण्याबाबत शासन आदेश देत आहे.

१. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक डीओआय-२०८१/४७०१/एडीएम-५, दिनांक २६ एप्रिल १९८२ च्या जोडपत्रातील :—

(एक) परिच्छेद ३.२ मधील (ह) च्या खाली "(आय) नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाल्यानंतर पुर्ननियुक्त झालेल्या व्यक्ती" अशी **नवीन बाब घालण्यात यावी.**

(दोन) विद्यमान परिच्छेद ९.८ बदलून त्या जागी खालीलप्रमाणे **परिच्छेद ९.८ टाकावा :—**

"९.८. जर एखादा "कर्मचारी" प्रतिनियुक्तीवर किंवा परकीय सेवेत गेला तर प्रतिनियुक्तीवर घेणाऱ्या प्राधिकरणाने/परकीय मालकाने वर्गणी वसूल करून ती शासकीय कोषागारात/बँकेत "८११, विमा व निवृत्तिवेतन निधी—इतर विमा आणि निवृत्तिवेतन निधी—राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना" या लेखा शीर्षाखाली जमा करावी. तदनंतर चलनाची एक प्रत त्या शासकीय कर्मचाऱ्याच्या मूळ विभाग प्रमुखाकडे पाठवावी. भावी काळात प्रतिनियुक्तीच्या/परकीय सेवेच्या अटींमध्ये या आशयाचे आवश्यक ते कलम समाविष्ट करण्यात आले आहे याची खात्री करून घेण्यात येईल. या रकमेच्या वसुलीवर मूळ विभागाचा विभाग प्रमुख लक्ष ठेवील. कोणत्याही वेळी वर्गणीची वसुली थकबाकीत गेली तर ती थकबाकी बचत निधीतील जमा रकमेवर "योजने" नुसार अनुज्ञेय असलेल्या व्याजासह तीनपेक्षा अधिक नाही इतक्या हप्त्यांमध्ये वसूल करण्यात येईल. त्याचप्रमाणे मूळ विभागाने प्रतिनियुक्तीवर असलेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत अभिलेख उदा. नमुना एक किंवा दोन मध्ये निर्गमित केलेले सदस्यत्व, नमुना क्र. आठ चे परिरक्षण, सेवा पुस्तकातील (अराजपत्रित कर्मचाऱ्यांच्या बाबतीत) सदस्यत्व व नामनिर्देशनाच्या बाबतीतील नोंदी इत्यादी गट विमा योजनेचे अभिलेख अद्ययावत ठेवावे."

(तीन) **सुधारित ९.८ या परिच्छेदाखाली** खालीलप्रमाणे नवीन परिच्छेद **दाखल करण्यात यावा :—**

"९.९. एका कार्यालयातून दुसऱ्या कार्यालयात बदली झालेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत सदस्यांच्या वर्गनिहाय नोंदवहीत जी **नमुना क्र. ८** वरून तयार केली जाते त्याचा पूर्ण उतारा पूर्वीच्या विभाग प्रमुखाने नवीन विभाग प्रमुखाकडे पाठवावा व त्याबद्दलची पोच पावती प्राप्त करावी. नवीन विभाग प्रमुखाने त्यांच्या कार्यालयात तयार करण्यात आलेल्या **नमुना क्र. ८** मधील सदस्यांच्या नोंदवहीत योग्य ती नोंद घ्यावी."

(चार) विद्यमान परिच्छेद ११.७ चे नंतर खालीलप्रमाणे दोन नवीन परिच्छेद **दाखल करण्यात यावेत :—**

"११.८. जर एखादा "कर्मचारी" नियमित शासकीय कर्मचारी असेल परंतु काही कारणामुळे त्याला योजनेचे सदस्य करून घेण्याचे राहून गेले व त्याच्याकडून वर्गणी वसूल करण्यापूर्वीच त्याला मृत्यू आला तर त्याची वर्गणी तो समासद होण्यास पात्र झालेल्या वर्षापासून देय रकमेतून कापून बाकी देय रक्कम त्याच्या वारसांना/नामनिर्देशित व्यक्तींना देण्यात येईल."

"११.९. जो शासकीय कर्मचारी प्रतिनियुक्तीवर/परकीय सेवेत गेला असेल तर मूळ विभाग प्रमुखाने जो की, गट विमा योजनेचा अभिलेख परिच्छेद ९.८ मध्ये नमूद केल्याप्रमाणे अद्ययावत ठेवतो, त्याने, शासकीय कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यास/सेवेतून काढून टाकल्यास/प्रतिनियुक्तीवर असताना/परकीय सेवेत असताना मृत्यू पावल्यास, बचत निधी आणि/किंवा विमा निधीतील रकमेच्या प्रदानाचे मंजुरी आदेश निर्गमित करावे."

(पाच) विद्यमान **परिच्छेद १६ रद्द करण्यात यावा.**

(सहा) विद्यमान **परिच्छेद १७.१ रद्द करण्यात यावा व परिच्छेद १७.२ ला नव्याने** परिच्छेद "१७" असा क्रमांक **देण्यात यावा.**

(सात) **परिच्छेद १७ च्या शेवटी खालीलप्रमाणे** नवीन वाक्याची **भर घालावी :—**

"कार्यालय प्रमुखांच्या बाबतीत नमुना एक आणि दोन, विभाग प्रमुखाने निर्गमित करावा आणि विभाग प्रमुखांच्या बाबतीत ते नमुने मंत्रालयातील संबंधित प्रशासकीय विभागाने निर्गमित करावे."

(आठ) विद्यमान परिच्छेद १९.३ च्या शेवटी खालील वाक्य **दाखल करावे :—**

"कुटुंबातील व्यक्तीखेरीज दिलेले नामनिर्देशनपत्र अवैध ठरविण्यात येईल. असे प्रकरण नामनिर्देशनपत्र देण्यात आलेले नाही असे समजून शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक डीओआय-२०८१/सीआर-३३६/८२/एडीएम्-५, दिनांक १ फेब्रुवारी १९८३ च्या परिच्छेद १९.१० मधील सूचनांनुसार नियमित करण्यात येईल."

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२ मध्ये, खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात याव्यात :—

(अ) "अ—वर्गणीदारांकडून वसुली" या परिच्छेद **एक** च्या भागातील,—

(एक) **परिच्छेद (ड)** मधील "याशिवाय एप्रिल १९८३ या महिन्याच्या वेतन बिलाला जोडून त्यांनी गट विमा योजना नमुना तीनमधील एक विवरणपत्र (दोन प्रतीत) सादर केले पाहिजे." हे वाक्य **रद्द करण्यात यावे.**

(दोन) परिच्छेद (ड) च्या उर्वरित भागातील पहिल्या ओळीतील शब्द आणि अंक "आणि तीन" तसेच दुसऱ्या ओळीतील "आणि एप्रिल" हे शब्द **रद्द करण्यात यावे.**

(ब) (एक) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२ च्या विद्यमान परिच्छेद **दोन ला परिच्छेद दोन (अ)** असा **नवीन क्रमांक देण्यात यावा** आणि

"स्वयं आहरण अधिकारी असलेल्या अधिकाऱ्याकडूनही त्यांची नामनिर्देशनपत्रे मिळवून ती लेखा परीक्षा कार्यालयाला सादर केली पाहिजेत" हे परिच्छेदाच्या शेवटचे वाक्य **रद्द करण्यात यावे** आणि "अनेक स्वयं आहरण अधिकाऱ्यांच्या वसुल्या ह्या कर्मचारीवृंदाचे वेतन काढण्यास कार्यालयाने प्राधिकृत केलेल्या मुख्य आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या नावे दाखवाव्या." हे वाक्य **तेथे टाकावे.**

(दोन) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२ च्या, "अ" भागातील परिच्छेद-दोनच्या शेवटी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२ च्या, बाब दोन (६) अन्वये ज्या मजकुराची भर घालण्यात आली तो **रद्द करण्यात यावा** आणि शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२ च्या वरील **परिच्छेद दोन (अ)** च्या खाली, दोन (ब), दोन (क) आणि दोन (ड) हे नवीन परिच्छेद खालीलप्रमाणे **दाखल करण्यात यावेत :—**

**परिच्छेद दोन (ब).**—"कार्यालय प्रमुखांनी/विभाग प्रमुखांनी स्वयं आहरण अधिकाऱ्यांकडून नामनिर्देशनपत्र प्राप्त करून घ्यावे आणि ते त्यांच्या कार्यालयात ठेवून घ्यावे. नामनिर्देशनपत्रातील बाब क्र. १ ते ६ बाबतचा तपशील शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक डीओआय-२०८१/४७०१/एडीएम-५, दिनांक २६ एप्रिल १९८२ अन्वये, विहित करण्यात आलेल्या **नमुना क्र. ८** मधील सदस्यांच्या नोंदवहीत प्रत्येक स्वयं वेतनी अधिकाऱ्यांच्या नावासमोर दाखल करावा. या नोंदी नमुन्याच्या **स्तंभ क्र. १०** मध्ये "नामनिर्देशनपत्राचा तपशील" या शीर्षाखाली घ्याव्यात."

"प्रदानाबाबतचा तपशील" या शीर्षाचा नवीन **स्तंभ क्र. ११** ह्या नोंदवहीत **उघडण्यात यावा.**

शेवटचा स्तंभ क्र. १२ हा "अभिप्राया" करिता ठेवण्यात यावा. सुधारित **नमुना क्र. ८** या शासन निर्णयासोबत जोडला आहे.

**परिच्छेद दोन (क).**—"एका कार्यालयातून दुसऱ्या कार्यालयात बदली झालेल्या सदस्यांच्या बाबतीत नोंदवही क्र. ८ चा पूर्ण उतारा पूर्वीच्या कार्यालय प्रमुखाने दुसऱ्या कार्यालयाकडे पाठवावा आणि त्याबाबतची पोच पावती प्राप्त करावी. दुसऱ्या कार्यालय प्रमुखांनी त्यांच्या कार्यालयात असलेल्या **नमुना क्र. ८** मधील सदस्यांच्या नोंदवहीत याबद्दलची नोंद करावी. नवीन कार्यालयास उतारा पाठविताना जुन्या कार्यालयाने बदली झालेल्या कर्मचाऱ्याची समुचित वर्गणी वसूल करण्यात आली असे प्रमाणित करावे."

**परिच्छेद दोन (ड).**—"प्रतिनियुक्तीवर/परकीय सेवेत असलेल्या राजपत्रित/अराजपत्रित कर्मचाऱ्यांच्या बाबतीत नामनिर्देशनपत्रे संबंधित मूळ विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांकडून प्राप्त करून घ्यावीत. नामनिर्देशनपत्रातील नोंदी **नमुना क्र. ८** मधील सदस्य नोंदवहीत मूळ विभाग प्रमुखाने कराव्यात. परकीय प्राधिकरणास **नमुना क्र. ८** मधील सदस्य नोंदवहीतील उतारा पाठविण्याची आवश्यकता नाही."

(तीन) (अ) "कार्यालय/विभाग प्रमुखांची जबाबदारी" या शीर्षाखाली परिच्छेद दोनमध्ये असलेले शब्द "नमुना तीन" **रद्द करण्यात यावे.**

(ब) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२ च्या **परिच्छेद तीन (ब)** मधील "स्वयं आहरण अधिकारी असलेल्या अनेक अधिकाऱ्यांच्या संबंधातील वसुलीच्या रकमा, कर्मचाऱ्यांचे वेतन वगैरे काढण्याचा प्राधिकार ज्यांना दिला असेल अशा त्या कार्यालयाच्या प्रमुख आहरण व संवितरण अधिकाऱ्यांसमोर नोंदण्यात याव्या" हे शेवटचे वाक्य **रद्द करण्यात यावे.**

(क) "ड" परिच्छेदातील "समायोजने" या शीर्षाखालील संपूर्ण भाग **रद्द करण्यात यावा.**

(ड) "ई" परिच्छेदातील "वार्षिक आढावा" या शीर्षाखालील "गट विमा योजना नमुना—नऊ मधील अहवाल मिळाल्यावर आणि आवश्यक त्या बाबतीत समायोजने करून झाल्यावर" हे वाक्य **रद्द करण्यात यावे.**

**३.** याद्वारे असे आदेश देण्यात येत आहेत की, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२, अन्वये, विहित केलेल्या **गट विमा योजना नमुना क्र. तीन आणि नमुना क्र. ९** मध्ये वार्षिक सूचना सन १९८५ या वर्षाच्या सुरुवातीपासून संचालक, लेखा व कोषागारे यांना **पाठविण्याची आवश्यकता नाही.**

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२ अन्वये, विहित केलेल्या **गट विमा योजना नमुना—आठ** मधील शीर्ष "कोषागार कार्यालयात वापरण्यासाठी" या शब्दांची "आहरण व संवितरण अधिकाऱ्याने वापरण्यासाठी" अशी **पुनःस्थापना करण्यात यावी.**

**५.** शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू-१३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर, १९८२ च्या **परिच्छेद तीन (अ)** मधील दुसऱ्या व तिसऱ्या ओळीमधील "त्या शासकीय कर्मचाऱ्याला निवृत्तिवेतन मंजूर करण्यास सक्षम असेल त्या अधिकाऱ्याकडून" या वाक्याची अनुक्रमे **कर्मचाऱ्यांचा कार्यालय प्रमुख** आणि **कार्यालय प्रमुख** या शब्दांद्वारे **पुनःस्थापना करण्यात यावी.**

६. (एक) "शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२ च्या, **परिच्छेद तीन (अ) मधील** चवथ्या ओळीतील "पावती अंतर्भूत बिलासोबत" या वाक्यापूर्वी "गट विमा योजना नमुना आठमध्ये" हे शब्द **दाखल करण्यात यावे.**

(दोन) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२ च्या, **परिच्छेद तीन (अ)** मधील बहात्त्या ओळीतील "मंजुरी देणाऱ्या अधिकाऱ्याच्या आदेशाच्या नोंदीची सत्यप्रत पाठवील." या वाक्यानंतर खालील वाक्य **दाखल करण्यात यावे** :—

"ज्या शासकीय कर्मचाऱ्याचे/अधिकाऱ्याचे सेवापुस्तक ठेवले जात नाही अशा कर्मचाऱ्यांच्या बाबतीत गट विमा योजनेच्या फायद्याबाबतच्या मंजुरी आदेशाच्या नोंदी सदस्य नोंदवही (नमुना ८) मध्ये घेण्यात याव्या, आणि आहरण व संवितरण अधिकाऱ्याने संबंधित कर्मचाऱ्याबाबतचा सदस्य नोंदवहीचा उतारा प्रमाणित करून देयकासोबत पाठवावा."

७. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२ च्या, **परिच्छेद तीन (अ)** च्या शेवटी खालील **वाक्याची भर घालण्यात यावी** :—

"गट विमा योजनेच्या फायद्याच्या प्रदानाच्या मंजुरीचे आदेश या शासन निर्णयासोबत जोडलेल्या गट विमा योजना—नमुना अकरामध्ये काढावे."

८. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२ च्या, **परिच्छेद पाच (एक) (ब) आणि (क)** मध्ये आलेला "त्या नोंदवहीची एक प्रत" हा मजकूर **रद्द करण्यात यावा.**

९. (एक) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२ च्या, **परिच्छेद पाच (एक) (ब)** आणि (क) अन्वये, विहित करण्यात आलेला गट विमा योजना नमुना सहा आणि सात हा, या शासन निर्णया-सोबत जोडण्यात आलेल्या सुधारित गट विमा योजना नमुना सहा आणि सातप्रमाणे **सुधारित करण्यात यावा.**

(दोन) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२ चा **परिच्छेद पाच (एक) (ड)** हा खालीलप्रमाणे **बदलण्यात यावा** :—

"परिच्छेद अ (एक) (ह) मध्ये नमूद केल्याप्रमाणे वन, सार्वजनिक बांधकामे, पाटबंधारे विभाग जे की चेकने वेतन काढतात त्यांनी दिल्लीमधील अधिकारी वगळून त्यांच्या रोख पुस्तकात अशा जमा रकमेचा लेखा खालीलप्रमाणे दाखवावा :—

चेकद्वारे कोषागारात जमा करण्यात आलेल्या गट विमा योजनेच्या वसुल्या ह्या रोख पुस्तकाच्या डाव्या बाजूस (जमा बाजू) "८८२–रोख वित्तप्रेषणे—दोन–चेक" या लेखा शीर्षांतर्गत खाली दिलेल्या उदाहरणाप्रमाणे दाखवाव्यात :—

रु. १,००० (एकूण) वेतनाकरिता काढण्यात आलेल्या चेकच्या रकमेतून रु. ३०० ची कपात (सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी रु. २००, उत्सव अग्रीम रु. ५० आणि गवियो रु. ५०) ही रोख पुस्तकात खालीलप्रमाणे **दाखविण्यात यावी** :—

| जमा | रुपये | प्रदान |
|---|---|---|
| निव्वळ रकमेचा काढलेला चेक—दोन चेक्स .. .. | ७०० | "वेतन" या संबंधित प्रधान |
| गवियो वसुलीचा काढलेला चेक—दोन चेक्स .. .. | ५० | शीर्षांतर्गत खर्ची घालावे. |
| सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी .. .. .. | २०० | |
| उत्सव अग्रीम .. .. .. | ५० | १,००० |
| एकूण | १,००० | एकूण १,००० |

गट विमा योजनेच्या वसुलीचे चेक सममूल्य रकमेच्या चलनासोबत यथोचितरीत्या जोडून पुस्तक समायोजनेसाठी कोषागाराकडे पाठवावेत.

१०. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२ चा विद्यमान **परिच्छेद सहा (ब)** खालीलप्रमाणे **बदलण्यात यावा** :—

"महामंडळाकडे, स्थानिक निधीकडे किंवा इतर राज्याकडे प्रतिनियुक्तीवर असलेल्या व्यक्तींच्या बाबतीत त्यांची या योजनेच्या वर्गणीची रक्कम, त्यांच्या सेवा घेणाऱ्याने, '८११, विमा आणि निवृत्तिवेतन निधी–इतर विमा व निवृत्तिवेतन निधी–राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना' या प्रधान शीर्षाखाली जमा केली पाहिजे. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२ अन्वये, विहित करण्यात आलेल्या गट विमा योजना **नमुना दोन सोबत** चलनाची एक प्रत सुद्धा सेवा घेणाऱ्याने प्रतिनियुक्तीवर असलेल्या शासकीय कर्मचाऱ्याच्या मूळ विभाग प्रमुखाकडे सादर करावी."

११. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२ मध्ये, विहित केलेल्या **नमुना क्र. बार** (जमा नोंदवही) मध्ये :—

(अ) डाव्या बाजूच्या कोपऱ्यात "आहरण व संवितरण अधिकाऱ्याचे नाव" हे शब्द "प्रधान शीर्ष" या शब्दांनी बदलण्यात यावे, आणि

(ब) विवरणपत्रातील स्तंभ (२) मधील "प्रधान शीर्ष" हे शब्द "आहरण व संवितरण अधिकारी" या शब्दांनी बदलण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि. गो. पाध्ये,
शासनाचे उप सचिव,
वित्त विभाग.

(या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.)

सहपत्रे :—(१) सुधारित गविपो नमुना क्रमांक सहा व सात.

(२) सुधारित नमुना क्रमांक आठ.

(३) नवीन गविपो नमुना क्रमांक अकरा.

प्रति :—

सर्व विभागीय आयुक्त,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
महालेखापाल, महाराष्ट्र–एक, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता),
महालेखापाल, महाराष्ट्र–एक, मुंबई (लेखा परीक्षा),
महालेखापाल, महाराष्ट्र–दोन, नागपूर, (लेखा व अनुज्ञेयता),
महालेखापाल, महाराष्ट्र–दोन, नागपूर (लेखा परीक्षा),
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवीन मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सर्व मंत्री, राज्यमंत्री आणि उप मंत्री यांचे स्वीय सहायक,
महाराष्ट्र राज्यातील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
मंत्रालयाचे सर्व विभाग,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे/नागपूर/नाशिक/औरंगाबाद,
वित्त विभागातील सर्व प्रशासन कार्यासने व कार्यासन अर्थसंकल्प-५,
निवड नस्ती, वित्त विभाग, प्रशासन-५.

---

*पत्राने

## गट विमा योजना—सुधारित नमुना सहा

### जमा रकमांचा एकत्रित मासिक अहवाल

कोषागार—

महिना . . . . . . . . . . . .

| कर्मचाऱ्यांची वर्गनिहाय संख्या आणि एकत्रित दराने त्यांच्याकडून वसूल केलेली रक्कम | | | | | | | | | | कर्मचाऱ्यांची वर्गनिहाय संख्या आणि विम्याच्या हप्त्यांच्या दराने त्यांच्याकडून वसूल केलेली रक्कम | | | | | | | | | | एकूण वसुली स्तंभ २(ब) + ४(ब) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्ग एक | | वर्ग दोन | | वर्ग तीन | | वर्ग चार | | एकूण वसुली | | वर्ग एक | | वर्ग दोन | | वर्ग तीन | | वर्ग चार | | एकूण वसुली | | |
| संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | |
| १(अ) | १(ब) | १(क) | १(ड) | १(ई) | १(फ) | १(ग) | १(ह) | २(अ) | (२)ब | ३(अ) | ३(ब) | ३(क) | ३(ड) | ३(ई) | ३(फ) | ३(ग) | ३(ह) | ४(अ) | ४(ब) | ५ |

कोषागार अधिकाऱ्यांची सही

## गट विमा योजना—सुधारित नमुना सात

### प्रदानांचा एकत्रित मासिक अहवाल

कोषागार—

महिना . . . . . . . . . . . .

प्रदानांचा वर्गनिहाय तपशील

| बचत निधी कर्मचाऱ्यांच्या संख्येसह प्रदानांच्या रकमा | | | | | | | | | | विमा निधी कर्मचाऱ्यांच्या संख्येसह प्रदानांच्या रकमा | | | | | | | | | | एकूण प्रदाने स्तंभ २(ब) + ४(ब) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्ग एक | | वर्ग दोन | | वर्ग तीन | | वर्ग चार | | एकूण | | वर्ग एक | | वर्ग दोन | | वर्ग तीन | | वर्ग चार | | एकूण | | |
| संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | संख्या | रक्कम | |
| १(अ) | १(ब) | १(क) | १(ड) | १(ई) | १(फ) | १(ग) | १(ह) | २(अ) | २(ब) | ३(अ) | ३(ब) | ३(क) | ३(ड) | ३(ई) | ३(फ) | ३(ग) | ३(ह) | ४(अ) | ४(ब) | ५ |

कोषागार अधिकाऱ्यांची सही.

(शा.म.मु) एच ३१५६—२ (१०,०००—४-८६)

## सुधारित प्रपत्र क्रमांक ८

### राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना, १९८२

### सदस्यांची नोंदवही

(परिच्छेद १८)

विमा निधीस व बचत निधीस वर्गणी भरणाऱ्या कर्मचाऱ्यांचा तपशील

| अनुक्रमांक | नाव | पदनाम | जन्म दिनांक | नियुक्तीचा दिनांक | वर्गणी भरण्यास सुरुवात केल्याचा दिनांक | वरच्या वर्गात बढती झाल्याचा/ दुसऱ्या विभागात बदली झाल्याचा दिनांक | सदस्यत्व संपुष्टात येण्याचा दिनांक व त्याचे कारण | मृत्यूचा दिनांक | नामनिर्देशन-पत्राचा तपशील | प्रदानाचा तपशील | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |

## गट विमा योजना नमुना क्रमांक ११

पहा—(१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक डीओआय. २०८१/४७०१/एडीएम-५, दिनांक २६ एप्रिल १९८२.

(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक ३० एप्रिल १९८२.

(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक टीआरडब्ल्यू. १३८१/८६७/एडीएम-९, दिनांक २१ सप्टेंबर १९८२.

(४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक डोओआय. २०८१/सीआर-३३६/८२/एडीएम-५, दिनांक १ फेब्रुवारी १९८३.

(५) नमुना क्रमांक ३ मध्ये श्री./श्रीमती यांचा दिनांक चा अर्ज.

(६) नमुना क्रमांक ५ मध्ये श्री./श्रीमती वारसदार यांचा दिनांक चा अर्ज पहावा.

---

क्रमांक विभाग/कार्यालय

**आदेश**

उपरोक्त अनुक्रमांक १ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयाच्या जोडपत्रातील परिच्छेद क्रमांक ११.१ व ११.२ अनुसार प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकाराचा वापर करून खाली सही करणार ........................ हे
(कार्यालय प्रमुखाचा हुद्दा)

कै./श्री./श्रीमती ........................ यांना सेवेत असताना दिनांक .......... रोजी
(कर्मचाऱ्याचे नाव)

मृत्यू आल्याने त्यांचे कायदेशीर वारसदार श्री./श्रीमती ........................ यांना विमा
(वारसदाराचे नाव)

निधीची रक्कम रु. .................. (रुपये ........................) तसेच व्याजासह
(अक्षरी)

बचत निधीची रक्कम रु. .................. (रुपये ........................) प्रदान करण्यास मंजुरी देत आहेत.
(अक्षरी)

श्री./श्रीमती ........................ हे/ह्या दिनांक .................. रोजी.
(कर्मचाऱ्याचे नाव)

नियत वयोमान पूर्ण झाल्यामुळे सेवानिवृत्त/ऐच्छिक सेवानिवृत्त/राजीनाम्यामुळे सेवेतून मुक्त झाल्याने त्यांना व्याजासह बचत निधीची रक्कम रु. .............. (रुपये ........................) प्रदान करण्याची मंजुरी देत आहेत.
(अक्षरी)

२. कै./श्री./श्रीमती ........................ यांचेकडून गट विमा योजनेखाली माहे .............. च्या
(कर्मचाऱ्याचे नाव)

वर्गणीची वसुली रु. .................. (रुपये ........................) वसूल करण्याचे आदेश देण्यात
(अक्षरी)

येत आहेत.

३. श्री./श्रीमती ........................ हे राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजनेचे
(कर्मचाऱ्याचे नाव)

दिनांक ........................ पासून सदस्य होते व ते दरमहा रु. १०/२०/४०/८० या दराने वर्गणी देत होते. तदनंतर त्यांची वर्ग .......... मधून वर्ग .......... मध्ये नियमित पदोन्नती झाल्यामुळे ते दिनांक .............. पासून रु. २०/४०/८० या दराने मासिक वर्गणी देत होते. त्यांना मृत्यू आला/ते सेवानिवृत्त झाले/त्यांनी राजीनामा दिला त्यावेळी ते वर्ग .......... मध्ये नियमित शासकीय कर्मचारी होते.

४. (ज्यांची सेवा पुस्तके संबंधित कार्यालयात ठेवली जातात त्या शासकीय कर्मचाऱ्यांकरिता).

प्रमाणित करण्यात येत आहे की, वरील अनुक्रमांक २ मध्ये नमूद केलेल्या शासन परिपत्रक दिनांक ३० एप्रिल १९८२ मधील परिच्छेद अ-१ व अनुक्रमांक ३ वरील शासन परिपत्रक दिनांक २१ सप्टेंबर १९८२ मधील परिच्छेद तीन (अ) मधील तरतुदीनुसार कै./श्री./श्रीमती .............................. यांच्या सेवापुस्तकात गट विमा योजनेच्या सदस्यत्वाची, नामनिर्देशनपत्र घेतल्याची व गट विमा योजनेखालील लाभ प्रदानाचा आदेश क्रमांक व दिनांक याची आवश्यक नोंद घेतलेली आहे.

४. (ज्यांच्या सेवेचे अभिलेख लेखा परीक्षा कार्यालयात ठेवले जातात अशा शासकीय अधिकाऱ्यांकरिता).

प्रमाणित करण्यात येत आहे की, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक गवियो. ११८३/प्र.क्र. ६६/८४/प्रशासन-५, दिनांक २८ फेब्रुवारी १९८६ मधील उपपरिच्छेद दोन (ब) मध्ये विहित केलेल्या सदस्य नोंदवही सुधारित नमुना क. ८ मध्ये श्री./श्रीमती .................................................... यांच्या बाबतीत गट विमा योजनेचे सदस्यत्व, नामनिर्देशनपत्र योजने-

(अधिकाऱ्याचे नाव)

खालील लाभ प्रदानाचा आदेश क्रमांक व दिनांक यांची आवश्यक नोंद घेतलेली आहे.

५. वरील बाबतीत होणारा खर्च खालील शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :—

"८११, विमा व निवृत्तिवेतन निधी—इतर विमा व निवृत्तिवेतन निधी—राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना"—

(अ) विमा निधी रु. ............ (रुपये ............................)
(अक्षरी)

(ब) बचत निधी रु. ............ (रुपये ............................)."
(अक्षरी)

कार्यालय/विभाग प्रमुख

प्रत अग्रेषित—

१. संबंधित व्यक्ती.
२. कोषागार अधिकारी.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता).
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरीक्षा).
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता).
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरीक्षा).
८. कर्मचाऱ्याची वैयक्तिक नस्ती.
९. संबंधित विभाग/कार्यालय प्रमुख.
१०. वित्त विभाग, प्रशासन-५.

टीप.—जे लागू नसेल ते खोडावे.

# GOVERNMENT OF MAHARASHTRA

FINANCE DEPARTMENT

Resolution No. GIS-1183/CR-66/84-ADM-5
Mantralaya, Bombay-400 032, dated the 28th February 1986

*Read*—Government Resolution, Finance Department, No. DOI-2081/4701/ADM-5, dated 26th April 1982.

Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 30th April 1982.

Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982.

## *RESOLUTION*

Government is pleased to direct that the orders contained in Government Resolution, Finance Department, No. DOI-2081/4701/ADM-5, dated 26th April 1982 and Government Circular, Finance Department, dated 30th April, 1982 and 21st September 1982 both bearing No. TRW-1381/867/ADM-9, regarding State Government Employees' Group Insurance Scheme, 1982, should be further modified as shown below:—

1. In the Annexure to Government Resolution, Finance Department, No. DOI-2081/4701/ADM-5, dated the 26th April 1982—

(*i*) after item (*h*) of paragraph 3.2 the following shall be *added*, namely:—

" (*i*) persons re-employed after superannuation;"

(*ii*) the existing paragraph 9.8 shall be *replaced* as follows, namely:—

" 9.8. If an 'employee' proceeds on deputation or on foreign service, the borrowing authority/foreign employer shall effect the recovery of the subscriptions and credit the same into Government Treasury/Bank under the Head of Account " 811-Insurance and Pension Funds—Other Insurance and Pension Funds—State Government Employees' Group Insurance Scheme." Thereafter, a copy of the chalan shall be sent to the parent Head of Department of the Government servant on deputation. It shall be ensured that the necessary clause to this effect is included in the terms of deputation/foreign service in future. The recovery of this amount shall be watched by the parent Head of Department. If at any time, the recovery of subscription falls in arrears, the same shall be recovered with interest chargeable under the 'scheme' on the accruals to the Savings Fund in not more than three instalments. Similarly the parent Department shall maintain the Group Insurance Scheme records such as issue of membership in Form No. I or II, maintenance of Form No. 8, entries in Service Book (in respect of non-Gazetted Government servant) about membership and nominations in respect of Government servant on deputation.";

(*iii*) the following new paragraph shall be *added* below paragraph 9.8, namely:—

" 9.9. The full extracts of the classwise Register of members maintained in Form No. 8 in respect of such a member who is transferred from one office to another office, should be sent to the latter Head of Office by the earlier office and acknowledgement obtained to that effect. The new Head of Office should take entries in Form No. 8 maintained by him in his office.";

(*iv*) the following two new paragraphs shall be *added* below the existing paragraph 11.7, namely:—

" 11.8. If any 'employee' is regular but he has not been enrolled as member of the 'Scheme' for any reason and he dies before the recovery of subscription from him, his dues shall be paid to the nominee/heirs after deducting the amount of subscription from the year he was eligible to become a member."

" 11.9. The parent 'Head of Department' who is maintaining the Group Insurance Scheme records of a Government servant on deputation/foreign service as mentioned in paragraph 9.8 shall issue a sanction for payment of accumulations in the Savings Fund and/or payment of the amount of insurance to a Government servant who retires/quits/dies while on deputation/foreign service.";

(*v*) the existing paragraph 16 shall be treated as *cancelled*;

(*vi*) the existing paragraph 17.1 shall be treated as *cancelled*, and paragraph 17.2., shall be *renumbered* as paragraph " 17 ";

(*vii*) the following shall be *added* at the end of paragraph 17, namely :—

" In the case of Head of Office himself the said Forms I and II shall be issued by the Head of the Department and in the case of the Head of Department himself, the forms shall be issued by the concerned Administrative Department of the Mantralaya.";

(*viii*) the following sentence should be *added* at the end of existing paragraph 19.3.

" The nomination in favour of a person other than the 'family' members shall be invalid. It will be treated as if nomination was not given and shall be regularised as per instruction in paragraph 19.10 in the Government Resolution, Finance Department, No. DOI-2081/CR-336/82/ADM-5, dated 1st February 1983.".

2. In Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated the 30th April 1982, the following amendments shall be *made*, namely :—

(*a*) In portion "A-Recoveries from subscribers" in paragraph I,—

(*i*) in clause (*d*), the words "In addition in the month of April 1983 they should furnish (in duplicate) a statement in Group Insurance Scheme Form III along with the pay bill" shall be *deleted*;

(*ii*) in the remaining portion of clause (*d*), the words and figures "and III" appearing in line one and the words "and April" appearing in line two shall be *deleted*.

(*b*) (*i*) Existing paragraph II of portion "A" in Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 30th April 1982 shall be *renumbered* as paragraph II(*a*) and the sentence "They should also obtain the nominations from the self-drawing officers and furnish them to the Audit" appearing at the end of paragraph II (*a*) *renumbered* as above shall be treated as *cancelled* and the sentence "Recoveries in respect of several self-drawing officers should be shown against the main Drawing and Disbursing Officer of the office authorised to draw the salaries etc. of the employees," shall be *inserted*.

(*ii*) The addition made at the end of paragraph II of portion "A" in the Government Circular, Finance Department, dated 30th April 1982 as per item II(6) of Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982, shall be treated as *cancelled* and the following new paragraphs II (*b*), II(*c*) and II(*d*) shall be *added* below the above paragraph II(*a*) in Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 30th April 1982, namely :—

"*Paragraph II* (*b*).—The Head of Office/Head of Department should obtain the nominations from the self-drawing officers and retain them in his office. The details of nomination from items 1 to 6 in the nomination form shall be entered in the Register of Members in Form No. 8 prescribed in Government Resolution, Finance Department, No. DOI-2081/4701/ADM-5, dated 26th April 1982 against the name of each personal salaried officer, who is a member of the 'scheme'. These entries shall be made in column No. 10 with the heading Details of nomination."

A new column No. 11 shall be opened in this register with the heading "Details of payment made" in which particulars about payment shall be noted.

The last column No. 12 shall be kept for "Remarks" Revised Form No. 8 is enclosed with this Resolution.

"*Paragraph II* (*c*).—The full extracts of the Register No. 8 in respect of a member who is transferred from one office to other office shall be sent to the latter Head of Office by the earlier office and acknowledgement obtained to that effect. The latter Head of Office shall take entries in the Register No. 8 maintained by him for his office. While sending the extracts to the new office, the earlier office shall also certify that appropriate subscriptions have been recovered from the employee who is transferred."

"*Paragraph II*(*d*).—In respect of the Gazetted/Non-Gazetted persons on deputation or on foreign service, the nominations shall be obtained by the concerned parent Head of Department/Office of the Government servant. Entries of nominations shall be made in the Register No. 8 of the parent Head of Department. It is not necessary to send extracts of the Register No. 8 to the Foreign body."

(*iii*) (*a*) In paragraph II, heading "Responsibility of Heads of Offices/Departments", reference to Form III shall be *deleted*;

(*b*) The last sentence *viz*. "Recoveries in respect of several self-drawing officers should be shown against the main Drawing and Disbursing Officer of the office authorised to draw the salaries etc. of the employee" occurring in the para III(*d*) of the Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9 dated 30th April 1982 under the caption, 'Responsibility of Treasury Officer and Pay and Accounts Officer' shall be *deleted*;

(*c*) The whole of portion "D" heading "Adjustments" shall be *deleted*;

(*d*) In portion "E" heading "Annual Review", the words "on receipt of the report in Group Insurance Scheme Form IX and making adjustments where necessary" shall be *deleted*.

3. It is hereby directed that beginning from the year 1985 it is not necessary to send to the Director of Accounts and Treasuries, the annual information in Group Insurance Scheme Form No. III and Form No. IX prescribed in Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 30th April 1982.

4. The title "For use in Treasury Office" appearing in Group Insurance Scheme Form No. VIII as prescribed in the Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 30th April 1982 shall be replaced by the words "For use by the Drawing and Disbursing Officer".

5. The words "the authority competent to sanction pension to the Government Employees" and the words "pension sanctioning authority" appearing in the 2nd and 3rd line of para III (*a*) in the Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982 may be *replaced* by the words *Head of office of the employee* and *Head of Office* respectively.

6. (*i*) In line four of para III(*a*) of the Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982 after the words "receipted bill preferred" the words "in Group Insurance Scheme Form VIII" shall be *inserted*.

(*ii*) In the line ten of para III (*a*) of Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982 after the sentence " by sanctioning authority along with the bill " shall be *added* the following sentence as under :—

" In respect of Government servant/officer whose Service Books are not maintained the entries of the orders sanctioning the Group Insurance Scheme benefits should be taken in the membership register (Form No. 8) and the Drawing and Disbursing Officer shall send the extract from the Membership Register in respect of concerned member duly certified along with the bill. "

7. The following sentence should be *added* at the end of para III (*a*) of the Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982 :—

" The order sanctioning the payment of Group Insurance Scheme benefits shall be in Group Insurance Scheme Form XI accompanying this resolution."

8. The words " copy of the register along with " appearing in para V(*i*) (*b*) and (*c*) of the Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982 shall be treated as *cancelled*.

9. (*i*) It is directed that the Group Insurance Scheme Form Nos. VI and VII prescribed in paragraph V (*i*) (*b*) and (*c*) of Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982 shall be modified as per revised Group Insurance Scheme Form Nos. VI and VII enclosed to this Resolution.

(*ii*) The existing paragraph V(*i*) (*d*) of the Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982 shall be *substituted* as follows :—

The Departments like Forest, Public Works/Irrigation etc. who draw salaries by cheques as mentioned in para A(1) (*h*) except officers in Delhi should account for such receipts in their Cash Book as shown below :—

The recoveries on account of the Group Insurance Scheme which are credited into Treasury by cheques should be exhibited on the left hand side (Receipt side) of the Cash Book under the head of account " 882, Cash Remittances—II Cheques" as per illustrations given as under :

Cheques drawn for salary of Rs. 1,000 (Gross) having deductions of Rs. 300 (G. P. F. Rs. 200, F. A. Rs. 50 and G. I. S. Rs. 50) will be exhibited in the Cash Book as under :—

| Receipt | | Payment |
|---|---|---|
| | Rs. | Rs. |
| Cheque drawn for net amount II cheques .. | 700 | Debit will appear under the concerned Major Head under " Salary". |
| Cheque drawn for G.I.S. recovery II cheques .. | 50 | |
| G.P.F. .. .. .. .. | 200 | |
| F.A. .. .. .. .. | 50 | 1,000 |
| Total .. | 1,000 | Total .. 1,000 |

Cheques representing G. I. S. recoveries duly accompanied by a challan of equivalent amount should be sent to the Treasury for Book adjustment.

9. The para VI(*b*) of the Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982 should be *substituted* as follows :—

" VI(*b*) In respect of persons on deputation to the Corporations, Local Funds, or other States, the amount of contribution to the scheme shall be credited to the Major Head " 811-Insurance and Pension Funds—Other Insurance and Pension Funds—State Government Employees' Group Insurance Scheme " by the borrower. The borrower shall also submit one copy of challan accompanied with the Group Insurance Scheme Form-II contained in Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 30th April 1982 to the parent Head of Department/office of a Government servant on deputation."

10. In Form No. IV (Register of Receipts) prescribed in Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982—

(*a*) for the words " Name of Drawing and Disbursing Officer " appearing in the left hand corner, *substitute* the words " Major Head "; and

(*b*) in column (2) of the statement for the words " Major Head ", *substitute* the words " Drawing and Disbursing Officer ".

By order and in the name of the Governor of Maharashtra,

V. G. PADHYE,
Deputy Secretary to Government,
Finance Department.

*Accompaniment.*—(1) Revised Group Insurance Scheme Form Nos. VI and VII.

(2) Revised Form No. VIII.

(3) New Group Insurance Scheme Form No. XI.

Copy to —

All Commissioners of Divisions,
The Secretary to the Governor,
The Secretary to the Chief Minister,
The Accountant General, Maharashtra-I, Bombay (Accounts & Entitlement),
The Accountant General, Maharashtra-I, Bombay (Audit),
The Accountant General, Maharashtra-II, Nagpur (Accounts & Entitlement),
The Accountant General, Maharashtra-II, Nagpur (Audit),
The Director of Accounts and Treasuries, Maharashtra State, Bombay,
The Chief Auditor, Local Fund Accounts, Maharashtra State, Konkan Bhavan, New Bombay,
The Pay and Accounts Officer, Bombay,
The Resident Audit Officer, Bombay,
The Deputy Chief Auditor, Local Fund Accounts, Bombay/Pune/Nagpur/Aurangabad/Nashik/Amravati,
The Personal Assistants to all Ministers, Ministers of State and Deputy Ministers,
All Heads of Departments/Offices in the State of Maharashtra,
*The Prothonotary and Senior Master, High Court of Judicature, Bombay,
*The Registrar, High Court of Judicature, Appellate Side, Bombay,
*The Registrar, Office of Lok Ayukta and Upa-Lok Ayukta, Bombay,
*The Secretary, Maharashtra Public Service Commission, Bombay,
*The Secretary, Maharashtra Legislature Secretariat, Bombay,
All Departments of the Mantralaya,
All Treasury Officers,
All Sub-Treasury Officers,
The Deputy Director of Accounts and Treasuries, Pune/Nagpur/Nashik/Aurangabad/Amravati,
All ADM, DESK and BUD-5,
The Select File.

*By letter.

## REVISED GROUP INSURANCE SCHEME—FORM VI

### MONTHLY CONSOLIDATED REPORT OF RECEIPTS

Treasury..........................

Month..........................

| Classwise amount recovered at Composite rates with No. of employees | | | | | | | | | | Classwise amount recovered at insurance Premia Rates with No. of employees | | | | | | | | | | Total Recovery |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| Class I | | Class II | | Class III | | Class IV | | Total | | Class I | | Class II | | Class III | | Class IV | | Total | | Col. 2(b) +4(b) |
| No. 1(a) | Amount 1(b) | No. 1(c) | Amount 1(d) | No. 1(e) | Amount 1(f) | No. 1(g) | Amount 1(h) | No. 2(a) | Amount 2(b) | No. 3(a) | Amount 3(b) | No. 3(c) | Amount 3(d) | No. 3(e) | Amount 3(f) | No. 3(g) | Amount 3(h) | No. 4(a) | Amount 4(b) | 5 |

Signature of the Treasury Officer.

## REVISED GROUP INSURANCE SCHEME—FORM VII

### MONTHLY CONSOLIDATED REPORT OF PAYMENTS

Treasury..........................

Months ..........................

| Classwise particulars of Repayments | | | | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| Saving Fund Amount of Repayments with No. of employees | | | | | | | | | | Insurance Fund Amounts of Repayments with No of employees | | | | | | | | | | Total Repayments |
| Class I | | Class II | | Class III | | Class IV | | Total | | Class I | | Class II | | Class III | | Class IV | | Total | | Cols. 2(b) +4(b) |
| No. 1(a) | Amount 1(b) | No. 1(c) | Amount 1(d) | No. 1(e) | Amount 1(f) | No. 1(g) | Amount 1(h) | No. 2(a) | Amount 2(b) | No. 3(a) | Amount 3(b) | No. 3(c) | Amount 3(d) | No. 3(e) | Amount 3(f) | No. 3(g) | Amount 3(h) | No. 4(a) | Amount 4(b) | 5 |

Signature of the Treasury Officer.

Revised G.I.S.—Form No. VIII

# STATE GOVERNMENT EMPLOYEES' GROUP INSURANCE SCHEME, 1982

## REGISTER OF MEMBERS

(Para 18)

Class

*Particulars of employees subscribing to Insurance Fund and Savings Fund*

| Serial No. | Name | Designation | Date of birth | Date of appointment in Government Service | Date of commencement of subscription (i.e. Date of membership) | Date of promotion to higher class/date of transfer to other deptts. | Date of cessation of membership and reason therefor | Date of death | Details of nomination | Details of payment made | Remarks |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 |

# GROUP INSURANCE SCHEME FORM XI

*Read :*

(1) Government Resolution, Finance Department, No. DOI-2081/4701/ADM-5, dated 26th April 1982.

(2) Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 30th April 1982.

(3) Government Circular, Finance Department, No. TRW-1381/867/ADM-9, dated 21st September 1982.

(4) Government Resolution, Finance Department, No. DOI-2081/CR-336/ADM-5, dated 1st February 1983.

(5) Read application dated (..............) in Form 3 from the employee/in Form 5, dated ........... from the nominee/heirs.

No. GIS- Department/Office

**Order**

In exercise of the powers delegated under para 11.1 and 11.2 of the Annexure of the Government Resolution referred at (1) above the undersigned is pleased to accord sanction to—

(*a*) Insurance Funds Rs. .................. (Rs. ......................) (In words)

(*b*) Saving Fund including Interest Rs. .......... (Rs. ...............................) (In words)

In favour of Shri/Smt. ............................................................ the nominee of late Shri/Smt. .................................................................... (Name of Government Servant)

who expired while in service on ........................................................ ./who ceased to be in service due to retirement/resignation/removal w. e. f. ..............................................

2. An amount of Rs. ........................ (Rs. ............................................) is (In words) recovered from Savings Fund on account of Group Insurance Scheme recovery of subscriptions for the month of ..........................................

3. Shri/Smt. ................................................................ is entitled as a member of State Government employees' Group Insurance Scheme w.e.f. ........................... and subscribed at the rate of Rs. 10/20/40/80 upto the month ..................... and thereafter at the rate of Rs. 20/40/80 on his regular promotion to class ............. w.e.f. ................. He was a regular class ................ Government servant at the time of death/retirement.

4. (For Government servants whose Service Books are maintained by the Departments).

Certified that necessary entries of the enrolment of membership, obtaining of nomination and No. and date of order sanctioning the payment of Group Insurance Scheme benefit have been made in the Service Books of late/retired Shri/Smt. ........................................ as per para A-I of Government Circular dated 30th April 1982 and para III(*a*) of Government Circular dated 21st September 1982 both bearing the No. TRW-1381/867/ADM-9.

*OR*

4. (For Government servant whose service record is maintained by the Audit Office).

Certified that the necessary entries of the enrolment of membership, nomination, and the number and date of order sanctioning the payment of Group Insurance Scheme benefits have been made in the membership register in revised Form No. 8 prescribed sub-paragraph II(*b*) of Paragraph 2 of the Government Resolution, Fiannce Department, No. GIS-1183/CR-66/84/ADM-5, dated 28th February 1986 in respect of Shri .......................................
(Name of Officer)

5. The expenditure on this account should be debited as under—

"811, Insurance and Pension Funds—Other Insurance and Pension Funds—State Government Employees' Group Insurance Scheme"—

(*a*) Insurance Fund Rs. .............. (Rs. ...................................)
(In words)

(*b*) Saving Fund Rs. ................ (Rs. ...................................)
(In words)

Signature of Head of Department/Office.

*Copy to*—

(1) Person concerned.

(2) Treasury Officer.

(3) Pay and Accounts Officer, Bombay.

(4) Accountant General, Maharashtra-I, Bombay (Accounts & Entitlement).

(5) Accountant General, Maharashtra-I, Bombay (Audit).

(6) Accountant General, Maharashtra-II, Nagpur (Accounts & Entitlement).

(7) Accountant General, Maharashtra-II, Nagpur (Audit).

(8) Personal File of person concerned.

(9) Concerned Head of Department/Office.

(10) Finance Department/ADM-5.

*Note.*—Whichever is not applicable should be scored out.